NO.4966/41 gr

नागपूर महानगरपालिकेमार्फत नागपूर मध्यवर्ती कारागृहाच्या जागेत घंटाघर बांधण्यास शासन मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग

शासन निर्णय क्र.एमआयएस २००३/प्र.क्र.५०/पीआरएस-२,
मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२, दिनांक : २६ मार्च, २००३

वाचा :- आयुक्त, नागपूर महानगरपालिका यांचे अर्धशासकीय पत्र क्र.एमसी/३४/२००३ दिनांक १७.२.२००३.

**शासन निर्णय** :नागपूर शहरामध्ये विविध विकासाची कामे सुरु असून पर्यटनाला चालना देणे, तसेच नागरिकांना आकर्षित करण्याच्या हेतूने शहर सुशोभित व सुंदर करणे असे विविध प्रकल्प नागपूर महानगरपालिकेने हाती घेतलेले आहेत. याचाच एक भाग म्हणून एक घंटाघर बांधण्याचा महापालिकेचा मानस आहे. तथापि, महानगरपालिकेकडे मोक्याची जागा उपलब्ध नसल्याने नागपूर मध्यवर्ती कारागृहाच्या स्वर्गीय राजीव गांधी पुतळयामागील अजनी चौकस्थित कोपऱ्यातील जागेत घंटाघर बांधण्यास परवानगी देण्याबाबत आयुक्त,नागपूर महानगरपालिका, नागपूर यांनी शासनास विनंती केली आहे.

२. नागपूर मध्यवर्ती कारागृहाच्या जागेत महानगरपालिका स्वत: किंवा प्रायोजकामार्फत घंटाघर बांधणार असल्याने कारागृह विभागास कोणताही आर्थिक भार पडणार नाही. तसेच यामुळे नागपूर शहराच्या सुंदरतेत व सुशोभिकरणात अधिक भर पडून पर्यटनाला चालना मिळणार असल्याने आयुक्त, महानगरपालिका, नागपूर यांनी केलेल्या विनंतीचा सर्वंकष विचार करून शासन या आदेशाद्वारे नागपूर मध्यवर्ती कारागृहाच्या स्वर्गीय राजीव गांधी पुतळयामागील अजनी चौकस्थित कोपऱ्यातील जागेत घंटाघर बांधण्यास परवानगी देत आहे, सदर घंटाघर बांधल्यानंतर जागेची मालकी पूर्वीप्रमाणेच कारागृह विभागाची राहील व या घंटाघराच्या देखभाल दुरुस्तीचा खर्च नागपूर महानगरपालिकेमार्फत केला जाईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

(र. ना. माळी)
कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन,

प्रति,
अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य पुणे,
जिल्हादंडाधिकारी,नागपूर
आयुक्त, नागपूर महानगरपालिका,नागपूर
कारागृह उपमहानिरीक्षक (पूर्व विभाग) नागपूर
अधिक्षक,नागपूर मध्यवर्ती कारागृह नागपूर.